**स्वामी जगद्‌गुरू शंकराचार्यपीठ, करवीर, कोल्हापूर या पीठास वाढीव मोबदला देणेकरिता नवीन लेखाशीर्ष उपलब्ध करून देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक, संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४२४/ज ५अ**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक. १२ जानेवारी २०१७

वाचा :-

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक. बैठक-३८१६/प्र.क्र.८५/ज ५अ, दिनांक.१०/११/२०१६.

२. महालेखाकार (लेखा व हकदारी)- II महाराष्ट्र, नागपूर यांचे पत्र क्रमांक TM/Gr.III/U.O.R. २३ / १४१९, दिनांक २६/१२/२०१६.

प्रस्तावना :-

श्री. स्वामी जगद्‌गुरू शंकराचार्यपीठ, करवीर, कोल्हापूर या पीठास तत्कालीन मुंबई सरकार यांच्या सन १८७३ च्या आदेशानुसार मंजूर रूपये १८६.७० मात्र या वार्षिक मोबदल्यात वाढ करण्याबाबतचा प्रस्तावासंदर्भात मा. मंत्रीपरिषदेने दि.२५/१०/२०१६ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, स्वामी जगद्‌गुरू शंकराचार्यपीठ, करवीर, कोल्हापूर या पीठास वाढीव मोबदला देणेबाबत या विभागाचा शासन निर्णय क्र.बैठक-३८१६/प्र. क्र.८५/ज ५अ, दि.१०/११/२०१६ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आला आहे.

उपरोक्त शासन निर्णय दि.१०/११/२०१६ मधील iii) येथील " सदरची रक्कम उक्त पीठास दरवर्षी अदा करण्यासाठी महसूल व वन विभागाकडे एक नवीन लेखाशीर्ष उघडून त्याखाली दरवर्षी देय ठरणाऱ्या रक्कमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्यात यावी." या अटीनुसार सदर प्रयोजनार्थ आगामी वर्षात अर्थसंकल्पिय तरतूद करणेकामी नवीन योजनेत्तर लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महालेखाकार (लेखा व हकदारी) - II महाराष्ट्र, नागपूर यांचे संदर्भ पत्र क्र.२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार, श्री. स्वामी जगद्‌गुरू शंकराचार्यपीठ, करवीर, कोल्हापूर या पीठास वाढीव मोबदला देणेकरिता पुढीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| मराठी लेखाशीर्ष | English Budget Head |
|---|---|
| महसूल व वन विभाग, मागणी क्र. सी - ५ | REVENUE AND FOREST DEPARTMENT, Demand No. C-05 |
| प्रधान लेखाशीर्ष :<br>२२५०, इतर सामाजिक सेवा<br>(०१) देणग्या<br>(००) (१०१) धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या<br>(१०१) (०१) सहाय्यक अनुदाने<br>(०१) (०३) जिल्हाधिकारी, कोल्हापूर | Major Head :<br>2250, Other Social Services<br>(01) Donations<br>(00) (101) Donations For Charitable purposes<br>(101) (01) Grant- in-Aid |

| | |
|---|---|
| उद्दिष्टये : (३१) सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)<br>संगणक सांकेतांक क्रमांक:<br>(२२५० ०२९१) (योजनेत्तर) (दत्तमत) | (01) (03) Collector, Kolhapur<br>Object : (31) Grant- in-Aid (Non-Salary)<br>Computer Code No. :<br>(2250 0291) (Non-Plan) (Voted) |

२. सदर शासन निर्णय महालेखाकार (लेखा व हकदारी)- ॥ महाराष्ट्र, नागपूर यांचे पत्र क्रमांक TM/Gr.III/U.O.R. २३ / १४१९, दिनांक २६/१२/२०१६. तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक.अनौसं.-३/अर्थ-६, दिनांक १०/०१/२०१७ यांस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११२१२५८०२२४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanasaheb R Dhane

Digitally signed by Nanasaheb R Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nanasaheb R Dhane
Date: 2017.01.16 15:52:50 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**कार्यासन अधिकारी,महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. मंत्री (महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५. विभागीय आयुक्त, पुणे
६. जिल्हाधिकारी, कोल्हापूर
७. आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर
८. सचिव, श्री. स्वामी जगद्गुरू शंकराचार्यपीठ, करवीर, २२९९, डी वॉर्ड, शुक्रवार पेठ, कोल्हापूर
९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
१०. कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प - ६/ व्यय-९), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१२.महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
१३.निवडनस्ती / कार्यासन ज ५अ, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२